**सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजनेंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २०२४/प्र.क्र.३०/एसडी-६

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:-३१ मार्च, २०२५

**वाचा:-**

१. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रिडा विभाग क्रमांक:-पीआरई २०११/प्र.क्र.२४९/प्राशि-१, दि.०१.१०.२०१३.
२. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रिडा विभाग क्रमांक संकीर्ण २०२१/प्र.क्र.१५२/एसडी-६/भाग-१, दि.०६.०२.२०२४
३. शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक :- अर्थसं २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४
४. शिक्षण संचालक, शिक्षण संचालनालय,(योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शिसंयो/यो-१-३०२/ रागाविअत-अनु.-मा- २४-२५/००५५६, दि.२४.०३.२०२५
५. शालेय शिक्षण व क्रिडा विभाग शासन निर्णय क्र. पुनर्वी २८२५/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प, दि.३१.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयानुसार इयत्ता १ ली ते १२ वी पर्यंत शिकणाऱ्या मुला/मुलींना अपघातामुळे क्षतीची नुकसान भरपाई देण्यासाठी "राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजना" नियमित स्वरुपात राबविण्यात येत आहे. सदर शासन निर्णयान्वये विद्यार्थ्याचा अपघात झाल्यास अनुज्ञेय सानुग्रह अनुदान व यासाठी आवश्यक कागदपत्रे नमूद करण्यात आली असून याबाबतचे प्रस्ताव निकाली काढण्यासाठी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली आहे.

संदर्भ क्र.२ अन्वये या योजनेच्या अंमलबजावणीसाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी आणि शिक्षणाधिकारी (योजना)(सर्व)/शिक्षण निरीक्षक (योजना), बृहन्मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी (DDO) म्हणून घोषित करण्यात आले आहे.

राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान या योजनेसाठी संदर्भ क्र.४ अन्वये नोंदविलेल्या मागणीच्या अनुषंगाने संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये पुर्नविनियोजनाद्वारे उपलब्ध झालेला रु.५,१०,२४,०००/-(अक्षरी रुपये पाच कोटी दहा लक्ष चोवीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

संदर्भ क्र.४ अन्वये पात्र ४३९ विद्यार्थ्यांकरीता रु.५.१०२ कोटी इतक्या निधीची मागणी करण्यात आली आहे. परंतु, सन २०२४-२५ मध्ये अर्थसंकल्पिक करण्यात आलेल्या रु.१०.०० कोटी इतक्या निधीपैकी दि.२६.०६.२०२४ रोजी रु.१.०० कोटी, दि.१४.१०.२०२५ रोजी रु. ७.४१ कोटी व दि.१२.०२.२०२५ रोजी रु.१.५९ कोटी असा एकूण रु.१०.०० कोटी इतका निधी यापूर्वीच उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. क्र.४ अन्वये नोंदविलेल्या मागणीच्या अनुषंगाने संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये पुर्नविनियोजनाद्वारे उपलब्ध झालेला

रु.५,१०,२४,०००/-(अक्षरी रुपये पाच कोटी दहा लक्ष चोवीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. या संदर्भात होणारा खर्च **"मागणी क्र. ई-०२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (०६) राज्यातील विद्यार्थ्यांसाठी अपघात विमा योजना (०६) (०२) राज्यातील विद्यार्थ्यांसाठी अपघात विमा योजना (कार्यक्रम) (२२०२ ३१०९) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)**" या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ च्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा असेल त्याच वेळी आहरीत करण्यात यावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवण्यात येऊ नये. संदर्भ क्र.०१ येथील शासन निर्णयामधील तसेच, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील परिपत्रकातील अटी व शर्तीचे काटेकोर पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे हे नियंत्रक अधिकारी असल्याने त्यांनी सर्व आहरण व संवितरण अधिकारी असलेल्या शिक्षणाधिकारी (योजना) (सर्व) वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील अटींची पूर्तता करून तरतूद वितरीत करण्याची दक्षता घ्यावी.

५. प्रतिक्षायादीतील कालानुक्रम विचारात घेऊनच निधी प्रत्यक्ष लाभार्थ्याला उपलब्ध करून द्यावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२६६/१४७१, दि.२७.०३.२०२५ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५२४/व्यय-५, दि.२९.०३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३११८१३१९३४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.31 18:14:04 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. आयुक्त(शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
३. जिल्हाधिकारी (सर्व),
४. शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. शिक्षण संचालक (माध्यमिक/उच्च-माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य, पुणे,

६. शिक्षण संचालक (योजना), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१-मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१-मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर,
९. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
११. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद (सर्व),
१२. शिक्षणाधिकारी (योजना), जिल्हा परिषद (सर्व),
१३. शिक्षण निरीक्षक(योजना), बृहन्मुंबई,
१४.सर्व जिल्हा कोषागारे,
१५.वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर,
१६. वित्त विभाग (व्यय-५/अर्थ-८) मंत्रालय, मुंबई,
१७.नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१८. कार्यासन (अर्थसंकल्प),शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आवश्यक त्या कार्यवाहीसाठी.
१९. निवड नस्ती (कार्यासन-एसडी-६).